**जिल्हा नियोजन समितीवरील तसेच कार्यकारी समितीवरील “नामनिर्देशित सदस्य” व “विशेष निमंत्रित सदस्य” यांच्या नियुक्त्या रद्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : डिएपी २०१९/प्र.क्र.१५१/का.१४८१-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २० डिसेंबर, २०१९

वाचा:- १) महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) (सुधारणा) अधिनियम, १९९८
२) महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) (सुधारणा) अधिनियम, २०००
३) महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (सभा घेणे) (सुधारणा) नियम २०१८

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) अधिनियम १९९८ मधील तरतदीनुसार प्रत्येक जिल्हयांसाठी जिल्हा नियोजन समिती घटीत करण्याची तरतुद आहे. त्यानुसार सर्व जिल्हयांसाठी जिल्हा नियोजन समित्यांची स्थापना करण्यात आलेली आहे.

महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) अधिनियम १९९८ च्या प्रकरण दोन, कलम ३ (३) दोन (ब) आणि (क) मधील तरतुदीनुसार राज्य शासनाकडून सर्व जिल्हयांच्या जिल्हा नियोजन समितीवर “नामनिर्देशित सदस्य” म्हणून नियुक्त्या करण्यात येतात. तसेच उक्त अधिनियमातील कलम ३ (तीन) (चार) (फ) मधील तरतुदीनुसार जिल्हा नियोजन समितीच्या अध्यक्षाशी विचार विनिमय करून राज्य शासनाकडून सर्व जिल्हा नियोजन समित्यांच्या क्षेत्रातील निवासी असलेल्या व्यक्तींना “विशेष निमंत्रित” म्हणून नामनिर्देशित करण्यात येते.

महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (सभा घेणे) (सुधारणा) नियम २०१८ मधील परिच्छेद ७ अनुसार राज्यातील सर्व जिल्हयांच्या जिल्हा नियोजन समित्यांना सहाय्य करण्यासाठी जिल्हा नियोजन समिती अध्यक्षांच्या अध्यक्षतेखाली “कार्यकारी समिती” घटीत करण्याची तरतुद आहे. त्यानुसार राज्य शासनाकडून विविध जिल्हयांच्या कार्यकारी समित्यांची स्थापना करण्यात आली आहे.

जिल्हा नियोजन समित्यांवर तसेच जिल्हा नियोजन समितीच्या कार्यकारी समित्यांवर “नामनिर्देशित सदस्य” तसेच “विशेष निमंत्रित सदस्य” यांच्या नियुक्त्या पुढील आदेशापर्यंत करण्यात आल्या असल्याने व आता या नियुक्त्या नव्याने करण्याचे प्रस्तावित असल्याने यापूर्वी उपरोक्त अधिनियम व नियमातील तरतुदींनुसार राज्य शासनाकडून करण्यात आलेल्या सर्व “नामनिर्देशित सदस्य” व “विशेष निमंत्रित सदस्य” यांच्या नियुक्त्या रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) (सुधारणा) अधिनियम, २००० मधील कलम ३ (३) दोन (ब) व (क) तसेच कलम ३ तीन, चार (फ) मधील तरतुदीनुसार राज्यातील सर्व जिल्हा नियोजन समित्यांवर “नामनिर्देशित सदस्य” व “विशेष निमंत्रित” सदस्य म्हणून राज्य शासनाकडून पुढील

आदेशापर्यंत करण्यात आलेल्या नियुक्त्या तसेच महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (सभा घेणे) (सुधारणा) नियम, २०१८ च्या अधिसुचनेतील परिच्छेद ७ (मूळ अधिनियमाचा नियम ६-अ) मधील तरतुदीनुसार राज्यातील जिल्हा नियोजन समित्यांच्या कार्यकारी समित्यांवर "नामनिर्देशित सदस्य" व "विशेष निमंत्रित सदस्य" म्हणून शासनाकडून पुढील आदेशापर्यंत करण्यात आलेल्या नियुक्त्या या शासन निर्णयान्वये त्वरीत प्रभावाने रद्द करण्यात येत आहे.

सर्व जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती यांनी उपरोक्त आदेश सर्व संबंधितांच्या निर्दशनास आणावे.

महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सदर शासन निर्णय उपलब्ध असून त्याचा सांकेतांक २०१९१२२०१२३९४६७११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

VIJESING FATTESING VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5494d2ad3a3bc5ddd66daf9a8f17ceec5e2d7d4b6a8bba99c51d275801bcdf1b, cn=VIJESING FATTESING VASAVE
Date: 2019.12.20 12:42:07 +05'30'

**( वि. फ. वसावे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल , मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री यांचे सचिवालय, मंत्रालय.
३) मा. मंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय.
४) मा. राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय.
५) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय.
६) विभागीय आयुक्त, कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
७) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव (सर्व)
८) मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व) जिल्हा परिषद
९) उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
१०) जिल्हा नियोजन अधिकारी (सर्व), जिल्हा नियोजन समिती.
११) निवडनस्ती, का.१४८१-अ.